**शासन घोषित पीकनिहाय किमान आधारभुत किंमत (MSP) ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारीत दरापेक्षा जास्त असल्यास, त्यावेळी महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज) ,अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर व शासन घोषित किमान आधारभुत किंमत (MSP) यामधील फरकाची रक्कम देण्यासाठी नविन योजना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण२७१७/प्र.क्र.१९९/१अे**

मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२.
दिनांक: १७ सप्टेंबर, २०१८.

**वाचा:-**

१. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांचे पत्र क्रमांक महाबीज / उत्पादन/ २०१७/ ५७५, दि.२३/१०/२०१७.

२. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांचे पत्र क्रमांक महाबीज/ उत्पादन/ २०१८/ ९७२, दि.२७/०३/२०१८.

३. राष्ट्रीय बीज निगम, विभागीय कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक Prodn.४() /NSC - PNA /२०१७-१८,दि.२७/०३/२०१८.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्यामार्फत दरवर्षी राज्यातील बिजोत्पादक शेतकऱ्यांकडून प्रमाणीत व पायाभुत दर्जाचे बियाणे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करून, पुढील हंगामात राज्यातील शेतकऱ्यांना माफक दरात उपलब्ध करून दिले जातात. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला व राष्ट्रीय बीज निगम यांच्यामार्फत बिजोत्पादक शेतकऱ्यांना त्यांनी उत्पादीत केलेल्या पात्र बियाणांस **"संबंधीत जिल्ह्यातील विहीत कालावधीतील दररोजच्या महत्तम भावाचा सरासरी दर अधिक पिक वाण व बियाणे दर्जा निहाय २० ते ३५ टक्के प्रोत्साहनपर रक्कम"** याप्रमाणे खरेदी धोरण पेरणी हंगामापुर्वी जाहीर करण्यात येते व त्यानुसार शेतकऱ्यांना शोधन अदा करण्यात येते. या बियाणे खरेदी धोरणाचा महत्त्वाचा घटक **"कृषि उत्पन्न बाजार समिती दर"** हा असून, मागील २ वर्षांपर्यंत सदर बियाणे खरेदी धोरणास शेतकऱ्यांचा उत्स्फुर्त प्रतिसाद होता व त्यामुळे शासनाने लक्षांकीत केलेले बियाणे उत्पादन होऊन राज्यातील **शेतकऱ्यांना प्रमाणीत बियाणे पुरवठा** करणे सोईचे जात होते.

२. सद्य:स्थितीत **कृषि उत्पन्न बाजार समिती मधील जवळपास सर्वच पिकांचे महत्तम बाजारभाव हे किमान आधारभुत किंमत (MSP) पेक्षा कमी असल्यामुळे, बिजोत्पादक शेतकरी कृषि उत्पन्न बाजार समितीमधील दराऐवजी किमान आधारभुत किंमत व त्यावर महामंडळाचे पुर्वघोषीत २० ते ३५ टक्के प्रोत्साहनपर रक्कमेची आग्रही मागणी करीत आहेत.** सदर बाबीमुळे महामंडळामार्फत बियाणे विक्रीचे माफक दर ठरविण्यास अडचणी येत असून, किमान आधारभुत किंमत व त्यावर प्रोत्साहनपर रकमेनुसार बियाणे खरेदीदर दिल्यास, बियाणे विक्री दरात वाढ होऊन, शेतकरी महाग बियाणे स्विकारणार नाही व त्यामुळे मोठ्या प्रमाणात बियाणे शिल्लक राहून महामंडळास आर्थिक भुर्दंड सोसावा लागेल. तसेच, **याबाबीचा राज्यातील बियाणे बदल दरावर सुद्धा विपरीत परिणाम होईल व यामुळे शेतकऱ्यांच्या एकरी उत्पादनावर सुद्धा विपरीत परिणाम होऊन राज्यातील उत्पादकता व उत्पादन कमी होऊ शकते.**

३. खरीप हंगाम २०१६ मध्ये उत्पादीत तुर या पिकासाठी बाजारभाव व किमान आधारभुत किंमत (MSP) यामध्ये मोठ्याप्रमाणावर तफावत असून देखील बिजोत्पादक शेतकऱ्यांना त्यांच्या मागणीनुसार खरेदी दर देण्यात आला होता. सदर खरेदी दरावर आधारीत तुर प्रमाणित बियाणे विक्री दर खरीप हंगाम २०१७ साठी काढला असता, शेतकऱ्यांनी सदर दरावर बियाणे खरेदी केले नाही. त्यामुळे **सुमारे २५,००० क्विंटल तुर बियाणे अवितरीत राहुन महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला या महामंडळास मोठ्या प्रमाणावर आर्थिक भार सहन करावा लागला होता.** अशीच परिस्थिती दरवर्षी राहिल्यास महामंडळ तोट्यात जाईल व पर्यायाने महाराष्ट्र राज्य हे बियाणे उत्पादनात स्वयंपुर्ण होणार नाही.

४. सन २०१७-१८ मध्ये काही पिकांसाठी (उदा. मुग, उडीद, तूर, हरभरा) **कृषि उत्पन्न बाजार समितीचे दर आणि महामंडळाकडून देय प्रोत्साहनपर राशी मिळून होणारा दर, हा किमान आधारभूत किंमतीपेक्षा कमी राहण्याची दाट शक्यता आहे.** यामुळे शेतकरी उत्पादीत बियाणांस किमान आधारभुत किंमत व त्यावर महामंडळाचे पुर्व घोषीत प्रोत्साहनपर रकमेची मागणी करीत आहेत. **उदाहरणार्थ,** मुग पिकाची आधारभुत किंमत ५५७५/- रुपये प्रति क्विंटल असून बाजारभाव मात्र ४००० ते ४५००/- रुपये प्रति क्विंटल दरम्यान आहे. सरासरी महत्तम दर ४२५०/-रुपये प्रति क्विंटल गृहित धरल्यास प्रमाणीत दर्जा बियाणाचा एकुण खरेदीदर २०/२५ टक्के प्रोत्साहनपर रकमेसह ५१०० ते ५३००/-रुपये प्रति क्विंटल पर्यंत होईल. बाजार भाव व किमान आधारभुत किंमत यामध्ये यावर्षी मोठ्याप्रमाणावर तफावत येत असल्यामुळे **बिजोत्पादक शेतकरी हे महामंडळास उत्पादीत बियाणे देण्यास तयार नाहीत व सदर बियाणांची विक्री शासनास किमान आधारभूत किंमतीनुसार (MSP) करतील व त्यामुळे पुढील वर्षापासून राज्यात विविध पिकांच्या बियाणांचा तुटवडा होण्याची दाट शक्यता आहे.**

५. मुग, उडीद, तुर, सोयाबीन, धान, गहु, हरभरा इत्यादी पिकांसाठी वाढीव बियाणे खरेदीदराच्या तुलनेत माफक बियाणे विक्रीदर राखणे कसरतीचे असल्यामुळे व यामध्ये नफ्याचे प्रमाण नगण्य असल्यामुळे खाजगी बियाणे उत्पादक कंपन्या अशा पिकांचा बिजोत्पादन कार्यक्रम मोठ्याप्रमाणावर राबवित नाही. यामुळे **अशा बियाणांच्या उपलब्धतेची जबाबदारी महामंडळाची असून**

**<u>कृषि आयुक्तालयातर्फे महामंडळास दरवर्षी बिजोत्पादन कार्यक्रमाचे लक्षांक देण्यात येते.</u>** तथापि,महामंडळास होणाऱ्या संभाव्य आर्थिक नुकसानीमुळे अशा वाणांचे उत्पादन बंद करावे लागेल, ज्यामुळे राज्यात बियाणांचा तुटवडा निर्माण होऊ शकतो. अशा परिस्थितीत **<u>बाजारभावाने कमी दरात बियाणे विकत घेऊन शेतकऱ्यांना वाढीव दरात विकुन खाजगी बियाणे कंपन्या गैरफायदा घेतील.</u>** कारण राज्यात काही नैसर्गिक आपत्तीच्या वेळी निर्माण झालेल्या **<u>बियाणे तुटवड्यावेळी खाजगी कंपन्यांनी अव्वाच्यासव्वा वाढीव दराने शेतकऱ्यांना बियाणे विकलेले आहेत.</u>**

६. यावर पर्याय म्हणून महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांनी दिनांक २३/१०/२०१७ रोजीच्या पत्रान्वये असे प्रस्तावित केलेले आहे की, **<u>राज्यामध्ये महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांच्यामार्फत मुग, उडीद, तुर, धान, सोयाबीन, हरभरा, गहू इत्यादी पिकांबाबत केंद्रशासनाद्वारे घोषीत किमान आधारभुत किंमत (MSP) व महामंडळाच्या जाहीर खरेदीधोरणानुसार निर्धारीत कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीतील महत्तम दराचा सरासरीदर, यामधील "फरकाची रक्कम" शासनाने बिजोत्पादक शेतकऱ्यांना अदा करावी.</u>** असे केल्यास बिजोत्पादकांना महामंडळाच्या जाहीर खरेदी धोरणानुसार कृषि उत्पन्न बाजार समितीच्या महत्तम दरावर प्रोत्साहनपर रकमेसह खरेदीदर मिळतील व त्यांचा बिजोत्पादन कार्यक्रमामधील सहभाग कायम राखण्यास मदत होईल.तसेच,**<u>सदर फरकाची रक्कम थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या आधारलिंक खात्यात जमा करता येईल.</u>** या करीता बिजोत्पादक शेतकऱ्यांची जिल्हानिहाय यादी, महामंडळाच्या पुर्व घोषीत बियाणे खरेदी धोरणानुसार कृषि उत्पन्न बाजार समिती दरावर आधारीत निर्धारीत दर महाबीज, अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे (NSC) यांच्याकडून कळविण्यात येतील.

७. कोणत्याही पिकांचे प्रमाणित बियाणे अथवा पायाभुत बियाणांचे उत्पादन कार्यक्रम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे, हे कृषि आयुक्तालयाने दिलेल्या उद्दिष्टाप्रमाणे घेतात. बिजोत्पादन कार्यक्रम राज्यात एकापेक्षा जास्त जिल्ह्यात घेतला जातो. बिजोत्पादक शेतकऱ्यांना उत्पादित प्रमाणित / पायाभुत बियाणांपोटी जी रक्कम दिली जाते, ती त्या जिल्ह्यांच्या ३ प्रमुख कृषि उत्पन्न बाजार समितीच्या पिकनिहाय विहित कालावधीतील दररोजच्या अधिकतम भावाचा सरासरी दर यावर आधारीत परिगणीत केली जाते. ही सरासरी विहित कालावधीत, पिकाची काढणी व बाजारातील आवक याप्रमाणे पिकनिहाय वेगवेगळी असते. बियाणे उत्पादनाकरीता वरीलप्रमाणे परिगणीत सरासरी बाजार दरावर प्रमाणित बियाणांकरीता २० ते २५ टक्के व पायाभुत बियाणांकरीता ३० ते ३५ टक्के प्रोत्साहन निधी दिला जातो.

८. पिकाचे जिल्हानिहाय विहित कालावधीतील दररोजचे अधिकतम दर जर MSP पेक्षा कमी असतील तर, ती फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याकरीता शासनाकडून अनुदान देण्याचा प्रस्ताव आहे. सदर अनुदान हे, प्रमाणित व पायाभुत बियाणांकरीता देय ठरेल. अशा प्रकरणी MSP मधील फरकाची रक्कम प्रोत्साहन अनुदान म्हणून महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज) अकोला आणि राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांना देण्यात येऊन त्यांच्याद्वारे ते, थेट लाभ हस्तांतरणाद्वारे बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बँक खात्यात जमा करण्यात येईल.

९. तेलंगणा, आंध्र प्रदेश या राज्यामध्ये सुद्धा महाबीजच्या बिजोत्पादन कार्यक्रम खरेदी धोरणानुसार बियाणे खरेदी होते. सन २०१७-१८ मध्ये बाजारभाव व किमान आधारभुत किंमत यामध्ये मोठा फरक आल्यामुळे सदर राज्यातील बिजोत्पादकांना किमान आधारभुत किंमत आधारीत बियाणे खरेदीदर तेथील महामंडळे देत असून तेथील राज्य शासन स्वत:च्या योजनेतून महामंडळाच्या बियाणे विक्री दरावर ३३ ते ४० टक्के बियाणे वितरण अनुदान (सबसीडी) देत आहे. त्यामुळे, त्या राज्यातील बिजोत्पादन कार्यक्रमांत स्थिरता आलेली असून, शेतकऱ्यांनासुद्धा माफक दरात प्रमाणित /पायाभुत बियाणे उपलब्ध होत आहेत.

तेलंगणा राज्यातील महामंडळ त्यांच्या बिजोत्पादकांना किमान आधारभुत किंमत अधिक २० टक्के प्रोत्साहनपर रक्कम यासह बियाणे खरेदीदर देत असून, त्याआधारे त्यांचा बियाणे विक्री दर निश्चित करतात. सदर बियाणे विक्री दरावर त्यांचे राज्य शासन स्वत:च्या योजनेमधून ३५ ते ३७ टक्के बियाणे वितरण अनुदान अदा करीत असून त्यामुळे, त्यांच्या राज्यातील शेतकऱ्यांना माफक दरात बियाणे मिळत आहे.

१०. सद्य:स्थितीत कृषि उत्पन्न बाजार समितीमधील जवळपास सर्वच पिकांचे महत्तम बाजारभाव हे किमान आधारभुत किंमत (MSP) पेक्षा कमी असल्यामुळे बाजारभाव व किमान आधारभुत किंमत यामध्ये यावर्षी मोठ्याप्रमाणावर तफावत येत असून, बिजोत्पादक शेतकरी महामंडळास उत्पादीत बियाणे देण्यास तयार नाहीत. त्यामुळे पुढील वर्षांपासून राज्यात विविध पिकांच्या बियाणांचा तुटवडा होण्याची दाट शक्यता आहे. यासंदर्भात महाराष्ट्र राज्यात उत्पादित प्रमाणित व पायाभुत बियाणांसाठी शासन घोषित किमान आधारभूत किंमत (MSP) व विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर यामधील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्यामार्फत बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबतची नविन योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कृषि उत्पन्न बाजार समितीमधील जवळपास सर्वच पिकांचे महत्तम बाजारभाव हे किमान आधारभुत किंमत (MSP) पेक्षा कमी असल्यामुळे बाजारभाव व किमान आधारभुत किंमत यामध्ये यावर्षी मोठ्या प्रमाणावर तफावत येत असून बिजोत्पादक शेतकरी महामंडळास उत्पादीत बियाणे देण्यास तयार नाहीत. त्यामुळे पुढील वर्षापासून राज्यात विविध पिकांच्या बियाणांचा तुटवडा होण्याची दाट शक्यता आहे. यासंदर्भात महाराष्ट्र राज्यात उत्पादित **प्रमाणित व पायाभुत बियाणांसाठी पीकनिहाय शासन घोषित किमान आधारभूत किंमत (MSP) ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दरांपेक्षा जास्त असल्यास, यामधील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्यामार्फत बिजोत्पादक शेतकऱ्यांना** देण्याबाबतची नविन योजना लागू करण्यात येत आहे. सदर योजना खरीप व रब्बी हंगाम २०१७-२०१८ मध्ये तयार झालेल्या व २०१८-१९ पासून पुढे वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या बियाणांतील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्यासाठी लागू राहिल.

२. बिजोत्पादक शेतकऱ्यांना देय रकमेची परिगणना ही, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज) अकोला व राष्ट्रीय बीज निगम, पुणे हे कृषि आयुक्तालय, पुणे यांच्याकडे सादर

करतील. सदर प्रस्तावाची छाननी करून कृषि आयुक्तालयामार्फत योग्य तो प्रस्ताव कृषि विभागास सादर करण्यात येईल. तद्नंतर अनुदान मंजुरीबाबत राज्य स्तरीय समिती निर्णय घेईल. सदर राज्य स्तरीय समितीची रचना खालीलप्रमाणे राहिल.

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (कृषि) | -अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (वित्त) | -सदस्य |
| ३. | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | -सदस्य |
| ४. | व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, अकोला | - सदस्य |
| ५. | विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय बीज निगम, पुणे | - सदस्य |
| ६. | महाव्यवस्थापक (उत्पादन), महाबीज, अकोला | - सदस्य |
| ७. | संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, पुणे | - सदस्य सचिव |

३. सदरची योजना खरीप व रब्बी हंगाम २०१७-१८ मध्ये तयार झालेल्या व २०१८-१९ पासून पुढे वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या बियाणांतील **फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना** देण्यासाठी लागू राहिल.

४. सदर फरकाची रक्कम थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या आधार लिंक्ड बँक खात्यामध्ये जमा करण्यात येईल.

५. या नविन योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा -१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७५/२०१८/व्यय-१, दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ अन्वये, तसेच, नियोजन विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१७१५५९१०३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e674 33a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.09.18 15:29:21 +05'30'

**(प्रकाश रा. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री(कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. मा.विरोधीपक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई.
४. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
७. विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय बीज निगम, गुलटेकडी, पुणे.
८. संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. महाव्यवस्थापक (उत्पादन), महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. सर्व विभागीय कृषि सह संचालक.
१३. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१६. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय,मुंबई.
१७. निवडनस्ती, कार्यासन १अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.